**माझी कन्या भाग्यश्री योजनेमध्ये बदल करुन**
**<u>सुधारित नविन योजना लागू करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भाग्यश्री-२०१७/प्र.क्र.१०७/का.३**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १ ऑगस्ट २०१७

<u>वाचा</u> :- (१) महिला व बाल विभाग शासन निर्णय क्र.सुकन्या-२०११/प्र.क्र.१४४/का-३, दि.१३ फेब्रुवारी २०१४
(२) महिला व बाल विभाग शासन निर्णय क्र.एबावि-२०१५/प्र.क्र.५४ (भाग-२)/का-६, दि.२६ फेब्रुवारी २०१६
(३) महिला व बाल विभाग शासन परिपत्रक क्र.एबावि-२०१५/प्र.क्र.४८/का-६, दि.२२ फेब्रुवारी २०१७
(४) महिला व बाल विभाग शासन निर्णय क्र.एबावि-२०१५/प्र.क्र.४८ /का-६, दि.२ मार्च २०१७

**<u>प्रस्तावना</u> :-** महाराष्ट्र राज्यामध्ये मुलींचे शिक्षण व आरोग्य यामध्ये सुधारणा करणे, त्यांच्या उज्ज्वल भविष्यासाठी आर्थिक तरतूद करणे, बालिका भ्रुणहत्या रोखणे ,मुलींचे जन्माबाबत समाजामध्ये सकारात्मक विचार आणणे ,बालविवाह रोखणे आणि मुला इतका मुलींचा जन्मदर वाढविणे यासाठी सुकन्या योजना दिनांक १ जानेवारी २०१४ पासून दारिद्रिय रेषेखाली जन्मणा-या प्रत्येक मुलीसाठी कुटुंबातील २ अपत्यापर्यंत लागू करण्यात आली होती. सदर योजनेचा शासन निर्णय दिनांक १३ फेब्रुवारी २०१४ रोजी निर्गमित करण्यात आलेला आहे. त्यानुसार योजनेची अंमलबजावणी आयुक्त, महिला व बालविकास पुणे यांच्याकडून करण्यात येत होती.

२. मुलींचा जन्मदर वाढविणे, लिंग निवडीस प्रतिबंध करणे ,मुलींच्या शिक्षणाबाबत प्रोत्साहन तथा खात्री देणे ,मुलींच्या आरोग्याचा दर्जा वाढविणे यासाठी माझी कन्या भाग्यश्री ही योजना दिनांक १ एप्रिल २०१६ पासून लागू करण्यात आलेली आहे. सदर योजना दारीद्रय रेषेखालील सर्व कुटुंबात जन्माला येणा-या दोन अपत्य मुलींसाठी लागू असून दारीद्रय रेषेवरील APL कुटुंबात जन्माला येणा-या मुलींसाठी या योजनेतील काही लाभ देण्यात येणार आहेत. सदर योजनेचा शासन निर्णय दिनांक २६ फेब्रुवारी २०१६ रोजी निर्गमित करण्यात आलेला आहे. माझी कन्या भाग्यश्री ही योजना राबविताना क्षेत्रिय कार्यालयांना येणा-या अडचणी विचारात घेऊन स्पष्टीकरणात्मक शासन परिपत्रक दिनांक २२ फेब्रुवारी २०१७ रोजी निर्गमित करण्यात आलेले आहे . तसेच योजनेच्या अंमलबजावणीचे कामकाज आयुक्त,महिला व बाल विकास पुणे यांच्याकडे सोपविण्यात आलेले आहे.

३. माझी कन्या भाग्यश्री ही योजना राबविण्यासाठी रुपये १५३.०० कोटी इतका खर्च येईल असा प्रस्ताव मा.मंत्रिमंडळास सादर करण्यात आला होता. मंत्रिमंडळाच्या दिनांक ७/१२/२०१५ च्या इतिवृत्तात योजनेसाठी आवश्यक निधीबाबत स्वतंत्र छाननी करुन मा.मुख्यमंत्री यांच्या मान्यतेने निर्णय घेण्यात यावा असे नमुद केलेले आहे. त्यानुसार निधीच्या तसेच योजनेत बदल करण्याच्या अनुषंगाने वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला असता सदर योजनमध्ये आमूलाग्र बदल करण्याबाबत वित्त विभागाने सुचविल्याप्रमाणे माझी कन्या भाग्यश्री हया योजनेमध्ये बदल करुन माझी कन्या भाग्यश्री सुधारीत योजना दिनांक १ ऑगस्ट २०१७ पासून लागु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**- मुलींचा जन्मदर वाढविणे, लिंग निवडीस प्रतिबंध करणे ,मुलींच्या शिक्षणाबाबत प्रोत्साहन तथा खात्री देणे ,मुलींच्या आरोग्याचा दर्जा वाढविणे यासाठी दिनांक १ एप्रिल २०१६ पासून लागू करण्यात आलेली "माझी कन्या भाग्यश्री" ही योजना या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करुन **" माझी कन्या भाग्यश्री सुधारित योजना "** दिनांक १ ऑगस्ट २०१७ पासून ज्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रुपये ७.५० लाख (सात लाख पन्नास हजार फक्त ) पर्यंत आहे अशा समाजातील सर्व घटकांसाठी लागू करण्यात येत आहे. सदर योजनेच्या लाभाचे निकष खालीलप्रमाणे रहातील.

| अ.क्र. | लाभ मिळण्यास पात्र लाभार्थी | शासनाकडून बँकेत गुंतवणुक करण्यात येणारी रक्कम | मुलीच्या वयाच्या टप्यानुसार द्यावयाची रक्कम ( अनुज्ञेय व्याज धरुन) |
|---|---|---|---|
| १ | एका मुलीनंतर मातेने/पित्याने कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केल्यानंतर अनुज्ञेय रक्कम | मुलीच्या नावे रु. ५०,००० बँकेत मुदत ठेव योजनेत गुंतवण्यात येईल. | १) रुपये ५०,०००/- इतक्या रक्कमेवर ६ वर्षासाठी अनुज्ञेय होणारे फक्त व्याज मुलीला वयाच्या ६ व्या वर्षी काढता येईल.<br>२) पुन्हा मुद्दल रुपये ५०,०००/-गुंतवणूक करुन ६ वर्षासाठी अनुज्ञेय होणारे व्याज वयाच्या १२ व्या वर्षी काढता येईल.<br>३) पुन्हा मुद्दल रुपये ५०,०००/-गुंतवणूक करुन ६ वर्षासाठी अनुज्ञेय होणारे व्याज + मुद्यल दोन्ही रक्कम वयाच्या १८ व्या वर्षी काढता येईल.<br>माता/पिता यांनी कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केल्याचे प्रमाणपत्र सादर केल्यानंतरच रुपये ५०,०००/- इतकी रक्कम मुलीच्या नावावर जमा करण्यात येईल. अशाप्रकारे जमा केलेल्या रक्कमेवर त्यावेळी मुलीचे वयानुसार देय असलेली व्याजाची रक्कम तीला अनुज्ञेय होईल. |
| २ | दोन मुलीनंतर मातेने /पित्याने कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केल्यानंतर अनुज्ञेय रक्कम | पहिल्या व दुस-या मुलीच्या नावे प्रत्येकी रु.२५,०००/- याप्रमाणे रु.५०,००० इतकी रक्कम दोन्ही मुलींच्या नावे बँकेत मुदत ठेव योजनेत गुंतवण्यात येईल. | १)रुपये २५,०००/- इतक्या रक्कमेवर ६ वर्षासाठी अनुज्ञेय होणारे फक्त व्याज मुलीला वयाच्या ६ व्या वर्षी काढता येईल.<br>२)पुन्हा मुद्दल रुपये २५,०००/-गुंतवणूक करुन ६ वर्षासाठी अनुज्ञेय होणारे व्याज वयाच्या १२ व्या वर्षी काढता येईल.<br>३)पुन्हा मुद्दल रुपये २५,०००/-गुंतवणूक करुन ६ वर्षासाठी अनुज्ञेय होणारे व्याज + मुद्यल दोन्ही रक्कम वयाच्या १८ व्या वर्षी काढता येईल<br>माता/पिता यांनी कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केल्याचे प्रमाणपत्र सादर केल्यानंतरच रुपये २५,०००/- इतकी रक्कम मुलीच्या नावावर जमा करण्यात येईल. अशाप्रकारे जमा केलेल्या रक्कमेवर त्यावेळी मुलीचे वयानुसार देय असलेली व्याजाची रक्कम तीला अनुज्ञेय होईल. |

## सदर योजनेच्या शर्ती/अटी खालीलप्रमाणे रहातील.

| |
|---|
| सदर योजना बँक ऑफ महाराष्ट्र मार्फत राबविण्यात येईल. त्यासाठी बँकेंसोबत आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई हे करारनामा करतील. बँकेसोबत मुदत ठेवीची कार्यपध्दती कशाप्रकारे राबविण्यात येईल याबाबतच्या सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. |
| मातेने/पित्याने कुटुंब नियोजनाची शस्त्रक्रिया केल्याचा दाखला योजनेचा लाभ घेण्यापूर्वी सादर करणे आवश्यक राहील. |
| माझी कन्या भाग्यश्री सुधारित योजनेचा लाभ १ ऑगस्ट २०१७ रोजी जन्मलेल्या व त्यांनतरच्या मुलींना अनुज्ञेय राहील. |
| माझी कन्या भाग्यश्री सुधारित योजना १ ऑगस्ट २०१७ पासून लागु करण्यात येत आहे. ज्या कुटुंबाना दिनांक १ ऑगस्ट २०१७ पुर्वी १ मुलगी आहे व दिनांक १ ऑगस्ट २०१७ नंतर दुस-या मुलीचा जन्म झाल्यास व माता/पित्याने कुटुंब नियोजनाचे प्रमाणपत्र सादर केल्यानंतर फक्त दुस-या मुलीला रुपये २५,०००/- इतका योजनेचा लाभ अनुज्ञेय राहील. |
| पहिले अपत्य मुलगा असल्यास व दुसरे अपत्य मुलगी झाल्यास किंवा पहिले अपत्य मुलगी असल्यास व दुसरे अपत्य मुलगा झाल्यास योजनेचा लाभ अनुज्ञेय नाही. |
| कुटुंबात पहिले अपत्य मुलगी आहे व दुसरे अपत्य मुलगी जन्मल्यास तीला हा लाभ देय असेल. मात्र तिसरे अपत्य जन्मल्यास त्यास हा लाभ अनुदेय नसेल.तिसरे अपत्य झाल्यास पहिल्या एक/दोन अपत्यांचे लाभही बंद होतील.तसेच प्रदान करण्यात आलेली रक्कम ९११ अतिप्रदानाची वसुली या लेखाशिर्षातंर्गत जमा करण्यात येईल. |
| लाभार्थी मुलीचे वडील महाराष्ट्र राज्याचे मूळ रहिवाशी असणे आवश्यक आहे. |
| योजनेचा लाभ घेण्यासाठी अर्ज करतांना बालिकेचे जन्म नोंदणी प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. |
| **मुदत ठेवीत गुंतवण्यात आलेली मुळ मुद्दल रक्कम व त्यावरील १८ व्या वर्षी देय असणारे व्याज अनुज्ञेय होण्यासाठी मुलीचे वय १८ वर्षे पूर्ण असणे व इयत्ता १० वी परिक्षा उत्तीर्ण असणे तसेच मुलगी अविवाहित असणे आवश्यक राहील.** |
| दुसऱ्या प्रसुतीच्या वेळेस जर जुळ्या मुली झाल्या, तर त्या मुली योजनेस पात्र असतील. |
| बालगृहातील अनाथ मुलींसाठी ही योजना अनुज्ञेय राहील. ( दत्तक पालकांनी मुलांचे अकाऊंट उघडुन हा लाभ त्या अकाऊंटला देण्यात येईल.)मात्र दत्तक पालकांवर योजनेच्या सर्व अटी/शर्ती लागू रहातील. |
| सदर योजना आधार सोबत जोडण्यात येईल. |
| विहित मुदतीपूर्वी (वयाची १८ वर्षे पूर्ण होण्यापूर्वी) मुलीचा विवाह झाल्यास, किंवा दहावी पूर्वी शाळेतून गळती झाल्यास किंवा दहावी नापास झाल्यास या योजनेचा फायदा तिच्या पालकांना होणार नसून, मुलीच्या नांवे बँक खात्यात जमा असणारी रक्कम महाराष्ट्र शासनाचे नांवे असणाऱ्या खात्यात जमा करण्यात येईल. मात्र नैसर्गिक कारणाने मुलीचा मुत्यु झाल्यास मुलीच्या नावे गुंतविण्यात आलेली रक्कम मुदत ठेवीची मुदत संपल्यानंतर पुर्ण रक्कम मुलीच्या पालकांना देय होईल. |
| प्रत्येक लाभार्थी मुलींसाठी स्वतंत्र खाते बँकेत उघडण्यात येईल. तसेच मुलीच्या नावे रक्कम बँकत जमा केल्यानंतर बँकेकडून देण्यात आलेल्या मुळ गुंतवणुक प्रमाणपत्राची प्रत लाभार्थ्यांस देण्यात यावी. व त्याची छायांकित प्रत शासकीय कार्यालयात जमा करुन ठेवण्यात यावी |

| |
|---|
| दिनांक १ जानेवारी २०१४ ते दिनांक ३१ मार्च २०१६ या कालावधीत सुकन्या योजना कार्यन्वीत होती. तसेच दिनांक १ एप्रिल २०१६ ते दिनांक ३१ जुलै २०१७ या कालावधीत जुनी माझी कन्या भाग्यश्री ही योजना कार्यन्वीत होती. सदर कालावधीत संबधित लाभार्थ्यांने अर्ज केला असेल व आजच्या निकषानुसार पात्र ठरत असेल तर त्यास या योजनेचा लाभ देय राहील. मात्र दिनांक १ ऑगस्ट २०१७ पासून सुधारित माझी कन्या भाग्यश्री योजनेमध्ये नमुद असलेले लाभ मंजूर करण्यात यावेत. |
| सदर योजनेसाठी कोणत्याही मध्यस्थ अथवा अन्य अशासकीय व्यक्तींचा सहभाग असणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. |
| वार्षिक उत्पन्न रुपये ७.५० लाख पर्यंत असल्याचे स्थानिक तहसिलदार यांचा उत्पन्नाचा दाखला सादर केल्यानंतरचा योजनेचा लाभ देण्यात यावा. |
| मुद्दलावर मिळणा-या व्याजाचा दर हा त्या त्यावेळी बँकेमार्फत लागु असलेल्या दरानुसार अनुज्ञेय राहील. |
| एका मुलीच्या जन्मानंतर माता /पित्याने १ वर्षाच्या आत कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया करुन योजनेचा लाभ मिळण्यासाठी संबधित बाल विकास प्रकल्प अधिकारी ग्रामीण/नागरी यांच्याकडे अर्ज सादर करणे आवश्यक आहे. त्यांनतर सादर केलेल्या अर्जाचा विचार करता येणार नाही. तसेच दोन मुलीनंतर ६ महिन्याच्या आत कुटुंबनियोजन केल्याचे प्रमाणपत्र अर्जासोबत सादर करणा-या कुटुंबांनाच या योजनेचा लाभ अनुज्ञेय असेल. |

## सुधारित माझी कन्या भाग्यश्री योजनेचा लाभ घेण्याची कार्यपध्दती:-

अ) सदर योजनेंतर्गत, लाभासाठी मुलीच्या पालकांनी, मुलीचा जन्म झाल्यावर संबंधित ग्रामीण व नागरी क्षेत्रातील संबंधीत स्थानिक स्वराज्य संस्थेत मुलीच्या जन्माची नोंदणी केल्यानंतर, त्या क्षेत्रातील अंगणवाडी सेविकेकडे प्रपत्र--अ॰ किंवा -ब॰ मध्ये (जे लागू असेल ते) अर्ज सादर करावा. अर्जासोबत उपरोक्त अटी व शर्ती नुसार नमूद दस्तऐवज सादर करण्यात यावेत. सदर योजनेसाठी आवश्यक असलेले सर्व अर्ज, राज्यातील प्रत्येक ग्रामीण व नागरी बाल विकास प्रकल्प अधिकारी, महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद, जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, विभागीय उपायुक्त (महिला बाल विकास) यांचे कार्यालयात विनामूल्य उपलब्ध असतील. अंगणवाडी सेविकेने संबंधीत लाभार्थ्यांकडून अर्ज भरून घ्यावा (गरजेप्रमाणे लाभार्थ्यांस अर्ज भरण्यास मदत करावी) आणि सदर अर्ज अंगणवाडी पर्यवेक्षिका / मुख्यसेविका यांच्याकडे सादर करावा.

(ब) अंगणवाडी पर्यवेक्षिका / मुख्यसेविका यांनी, सदर अर्जाची व प्रमाणत्रांची छाननी / तपासणी करुन प्रत्येक महिन्याला नागरी व ग्रामीण क्षेत्रातील बाल विकास प्रकल्प अधिकारी तसेच संस्थामधील अनाथ बालकांच्या बाबतीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद, यांना एकत्रित यादी मान्यतेसाठी सादर करावी. महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हा परिषद) यांनी योग्य ती छाननी करुन यादीस मान्यता देऊन बँकेस सादर करावी.

बालगृह/शिशुगृह किंवा महिला व बाल विकास विभागातंर्गतच्या इतर निवासी संस्थामधील अनाथ मुलींबाबत लाभ मिळण्यासाठी अर्ज सादर करण्या आधी संबधित बाल कल्याण समिती यांचे मुलगी अनाथ असल्याचे प्रमाणपत्र संबधित संस्थानी प्राप्त करुन घेऊन अर्जासोबत जोडणे आवश्यक आहे.

(क) संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद हे यादृच्छिक पध्दतीने ( Randomly ) जास्त संख्या असलेल्या एखाद्या वस्तीची तपासणी करतील व त्यांची खात्री झाल्यानंतर लाभार्थी यादीला मान्यता देतील. तद्‌नंतर एक महिन्याच्या कालावधीत बाल विकास प्रकल्प अधिकारी व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद हे पात्र लाभार्थ्यांचे अर्ज बँक ऑफ महाराष्ट्र शाखेकडे, लाभार्थ्यांला रुपये ५०,०००/- किंवा रुपये २५,०००/- पात्रतेनुसार एवढया रक्कमेची मुद्दत ठेव सर्टफिकेट मिळण्यासाठी सादर करतील, व बँकेकडून मिळालेले प्रमाणपत्र बाल विकास प्रकल्प अधिकारी /जिल्हा महिला बाल विकास अधिकारी यांच्यामार्फत संबंधीत लाभार्थ्याच्या पालकांना उपलब्ध करून देतील.

(ड) अर्जदारांनी संपूर्ण तपशीलासह भरून दिलेले अर्ज कागदपत्रासह वर नमूद केलेल्या संबंधित अधिकाऱ्यांनी मुलीच्या जन्मानंतर एका मुलीवर शस्त्रक्रिया करणा-या कुटुंबाच्या बाबतीत १ वर्षाच्या आत व दोन मुलींवर कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया करणा-या कुटुंबाच्या बाबतीत ६ महिन्याच्या आत कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केल्याचा दाखला जोडून सादर केलेले अर्ज स्वीकारावेत. अर्ज संपूर्ण भरलेला नसल्यास अथवा सर्व प्रमाणपत्रासह सादर केला नसल्यास, अर्ज मिळाल्यापासून १५ दिवसाच्या आत अर्जदारास लेखी कळवावे. अर्जदारांनी अपूर्ण भरलेले अर्ज किंवा आवश्यक ती कागदपत्रे जोडलेली नसल्यास अशा अर्जदारांना वरील मुदती व्यतिरिक्त वाढीव एक महिन्याची मुदत देण्यात येईल. मात्र कोणत्याही परिस्थितीत कोणताही अर्ज २ महिन्यांपेक्षा अधिक काळ प्रलंबित ठेवता येणार नाही, अन्यथा संबंधीतांवर जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

२. प्रधानमंत्री जनधन योजना :- या योजनेंतर्गत लाभार्थी मुलगी व तिची आई यांचे नांवे संयुक्त बचत खाते (नो फ्रील खाते) बँक ऑफ महाराष्ट या राष्ट्रीय कृत बँकेत उघडण्यात येईल. त्यामुळे या योजनेंतर्गत, रुपये १,००,०००/- अपघात विमा व रुपये ५०००/- ओव्हरड्राप्ट व इतर अनुज्ञेय लाभ घेता येतील. माझी कन्या भाग्यश्री योजनेंतर्गत अनुज्ञेय लाभ लाभार्थ्यांच्या प्रधानमंत्री जनधन योजनेंतर्गत बँक बचत खात्यात देण्यात येईल. सदर खाते उघडण्यास अंगणवाडी सेविका/मुख्य सेविका/पर्यवेक्षकीया अर्जदारास मदत करतील.

या योजनेंतर्गत प्रत्येक महिन्यात प्राप्त झालेले अर्ज यापैकी अपूर्ण व निकाली काढलेल्या अर्जाचा अहवाल प्रत्येक महिन्याच्या ३ तारखेपर्यंत महिला व बाल कल्याण अधिकारी (जिल्हा परिषद ) यांनी विभागीय उपायुक्तांकडे सादर करावा. विभागीय उप आयुक्त,महिला व बाल विकास यांनी त्यांच्या विभागाची माहिती संकलित करुन दरमहाच्या ५ तारखेपर्यंत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाकडे सादर करावा.

**३. योजना राबविणारी यंत्रणा :-**

**(अ)** सदर योजना राबविण्यासाठी खालीलप्रमाणे राज्यस्तरावर मार्गदर्शन व सनियंत्रण करण्यासाठी एक सुकाणु समिती गठीत करण्यात येत आहे. या समितीची ४ महिन्यातून एकदा बैठक आयोजित करण्यात यावी.सदर समिती या योजनेसाठी लाभार्थ्यांच्या उत्पन्नाची मर्यादा उपयुक्त आहे काय याचा आढावा घेतील.

| | | |
|---|---|---|
| १) सचिव, महिला व बाल विकास | - | अध्यक्ष |
| २) अ.मु. सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | - | सदस्य |
| ३) प्रधान सचिव,वित्त विभाग | -- | सदस्य |
| ४) प्रधान सचिव,नियोजन विभाग | --- | सदस्य |
| ५) प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग | - | सदस्य |
| ६) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | - | सदस्य |
| ७) सचिव, आदिवासी विकास विभाग | - | सदस्य |
| ८) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई | - | सदस्य |
| ९) आयुक्त,महिला व बाल विकास,पुणे | - | सदस्य |
| १०) युनायटेड नेशन पॉप्युलेशन फंड (UNFPA) | - | सदस्य |
| ११) उप सचिव, महिला व बाल विकास विभाग | - | सदस्य सचिव |

**(ब)** सदर योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी खालीलप्रमाणे एक कार्यकारी समिती गठीत करण्यात येत आहे. सदर समितीची ३ महिन्यातून एकदा बैठक आयोजित करण्यात यावी.

| | | |
|---|---|---|
| १) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई- | | अध्यक्ष |
| २) आयुक्त, महिला व बाल विकास,पुणे | - | सदस्य |
| ३) आयुक्त, कुटुंब कल्याण | - | सदस्य |
| ४) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | - | सदस्य |
| ५) आयुक्त, समाजकल्याण, पुणे | - | सदस्य |
| ६) संचालक (प्राथमिक शिक्षण, पुणे) | - | सदस्य |
| ७) उपआयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास, पुणे | - | सदस्य |
| ८) अतिरिक्त संचालक, SFWV | - | सदस्य |
| ९) PCPNDT (लिंग निवड प्रतिबंध चाचणी ) समन्वय अधिकारी, सा. आ. विभाग SFWB- | | सदस्य |
| १०) विभागीय उपायुक्त (महिला व बाल विकास) | | सदस्य |
| ११) प्रतिनिधी UNFPA | - | सदस्य |
| १२) सर्व जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| १३) उपायुक्त, (अंगणवाडी) ए.बा.वि.सेवायोजना,नवी मुंबई | - | सदस्य सचिव |

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई यांचेमार्फत योजनेचे मुल्यमापन दरवर्षी करण्यात यावे. तसेच कार्यकारी समितीच्या बैठकांचे अभिलेखही जतन करण्यात यावेत. तसेच मुदत ठेव प्रमाणपत्राच्या प्रतीचेही जतन करुन ठेवण्यात यावे.

४. सदर योजनेची अंमलबजावणीबाबत संनियंत्रण व मूल्यमापनाची जबाबदारी ,आयुक्त ,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई महाराष्ट्र राज्य , यांची राहील.

५ आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई आणि विभागीय उपायुक्त, महिला व बालविकास यांनी जिल्हा प्रसिध्दी अधिकारी यांच्या मदतीने या योजनेस पुरेशी प्रसिध्दी दयावी.

६. या योजनेखालील तरतुदी संदर्भात अडचण अथवा संभ्रम निर्माण झाल्यास त्याबाबत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई महाराष्ट्र राज्य, यांचेमार्फत शासनाकडे संदर्भ करावा. कोणत्याही वादग्रस्त मुद्दयांबाबत शासनाने दिलेला निर्णय अंतिम राहील.

७ माझी कन्या भाग्यश्री ही सुधारित योजना लागु केल्यामुळे सावित्रिबाई फुले कन्या कल्याण पारितोषिक योजनेची व्दिरुक्ती होत असल्यामुळे सदर योजना बंद करण्यात येऊन एकच माझी कन्या भाग्यश्री योजना सुरु ठेवण्यास मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली असल्यामुळे सार्वजनिक आरोग्य विभागाने त्याप्रमाणे आवश्यक सूचना तातडीने निर्गमित कराव्यात.

८. माझी कन्या भाग्यश्री सुधारित योजनेसाठी दरवर्षी रुपये १००.०० कोटी इतका नियतव्यय उपलब्ध करुन देण्याचे मा.मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आलेली असून सदर निधी यथावकाश अर्थसंकल्पित करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

९. हा शासन निर्णय मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक १८ जुलै २०१७ रोजी झालेल्या बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व अनौ.सं.क्र.१६८/१७/व्यय-६,दिनांक ३१/७/२०१७ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०११४५४०९१०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.08.01 17:48:29 +05'30'

( ला.रा.गुजर )
उप सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य
६. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. सचिव (महिला व बाल कल्याण विभाग), मंत्रालय, मुंबई

८. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. सचिव आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई
१२. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. आयुक्त,(कुंक) सार्वजनिक आरोग्य विभाग,मुंबई
१४. आयुक्त,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
१५. आयुक्त आदिवासी विकास, नाशिक
१६. सर्व विभागीय आयुक्त
१७. सर्व जिल्हाधिकारी
१८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१९. सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
१८. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास
१९. सर्व महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हा परिषद)
२०. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी )
२१. सर्व मुख्य अधिकारी, नगरपालिका,
२२. सर्व मंत्रालयीन विभाग
२२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२३. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
२४ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२८. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२९. निवड नस्ती (कार्यासन ६)

**प्रपत्र - अ**

**“माझी कन्या भाग्यश्री सुधारित योजना”**
**योजनेंतर्गत लाभ मिळविण्यासाठी मुलीच्या वतीने तिच्या पालकांनी करावयाच्या अर्जाचा नमुना**

**अर्ज**

१) अर्जदाराचे पुर्ण नाव
(आधार नंबर): : ----------------------------------------------
लाभार्थी मुलीशी असलेले नाते ) : ______________________________________

२) पत्ता (सध्याचा) : ______________________________________

: ______________________________________

(कायमचा)

______________________________________

__ ____________________________________

३) लाभार्थी मुलीच्या आईचे पुर्ण नाव : ______________________________________
आधार नंबर

४) लाभार्थी मुली/मुलींची माहिती :

| पुर्ण नाव | जन्म दिनांक | जन्म ठिकाण | जन्माची नोद कोठे केली आहे | नोंद केल्याची तारीख व क्रमांक (असल्यास) | **आधार नंबर** |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |

५) कुटुंबातील एकुण अपत्यांची माहिती

| अ.क्र. | अपत्यांची नावे | पु/स्त्री | जन्म दिनांक | वय | **आधार नंबर** |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| | | | | | |

६) अर्जदार महाराष्ट्र राज्याचा रहिवासी असल्याचा : ______________________________

दाखला जोडला आहे काय.

७) लाभार्थी कुटुंबाने एक/दोन अपत्यांच्या जन्मानंतर कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केली आहे काय? होय/नाही

८) यापुर्वी सावित्रीबाई फुले कन्या पारितोषिक योजनेचा लाभ घेतलेला आहे काय होय/नाही

अर्जात दिलेली वरील प्रमाणे रहिवास पत्ता, कुटुंबातील एकुण अपत्यांची संख्या इ. व इतर माहिती खरी असुन याबाबत कोणतीही माहिती खोटी आढळुन आल्यास माझी कन्या भाग्यश्री योजनेअंर्तगत भरलेली रक्कम / मिळालेले अनुदान वसुल करण्यास मी पात्र राहील.

अर्जासोबत जोडावयाच्या कागदपत्रांची यादी :-

१) कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया प्रमाणपत्र
२) उत्पन्नाचा दाखला
३) रेशनिंग कार्ड
४) सावित्रीबाई फुले योजनेचा लाभ न घेतल्याचे प्रमाणपत्र
५) लाभार्थी मुलींचे आधार कार्ड

(अर्जदाराची सही/अंगठा)

दिनांक:

-------------------------------------------------------------------------------------------

कार्यालयीन वापरासाठी

श्री/श्रीमती --------------------------------------------- यांनी सादर केलेल्या अर्जाची तपासणी करण्यात आली असून अर्ज शासन निर्णयानुसार परिपुर्ण आहे. (१) कु.------------------------------------- (२) कु.-------------------------------------------हिचा/हयांच्या नावे रुपये ---------------------- मुदत ठेव प्रमाणपत्र मिळण्यासाठी शिफारस करण्यात येत आहे.

स्वाक्षरी
( नाव )
बाल विकास प्रकल्प अधिकारी

दिनांक :-

प्रति,
महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हा परिषद)

**प्रपत्र – ब**

("माझी कन्या भाग्यश्री" या योजनेअंतर्गत बालगृहे/शिशुगृहे किंवा महिला व बाल विकास विभागांतर्गतच्या इतर निवासी संस्था येथील संस्थेच्या अधिक्षकाने जिल्हा महिला बाल विकास अधिकारी यांचेकडे करावयाच्या अर्जाचा नमुना)

**अर्ज**

१) बालगृह/शिशुगृह इ.संस्थेचे नाव व पत्ता: ______________________________
______________________________
______________________________

२) मुलीची माहिती
(उपलब्ध असलेली माहिती भरावी) :

| नाव | जन्म दिनांक | जन्म ठिकाण | जन्माची नोद कोठे केली आहे | नोंद केल्याची तारीख व क्रमांक(असल्यास) |
|---|---|---|---|---|
| | | | | |

३) मुलीगी संस्थेत दाखल होण्याची कारणे : - ______________________________
४) संस्थेत दाखल करणा-या व्यक्तीचे नाव पत्ता: ______________________________-
______________________________
______________________________

५) मुलीचे आधारकार्ड काढले असल्यास:-आधारकार्ड क्र.__________________

६) बाल कल्याण समितीने सदरहू मुलीस अनाथ घोषित केले असल्यास बालकल्याण समितीचा आदेश क्रमांक व दिनांक (सोबत बालकल्याण समितीने दिलेले प्रमाणपत्र जोडावे)

**प्रमाणपत्र**

प्रमाणीत करण्यात येते की, "माझी कन्या भाग्यश्री" या योजनेअंतर्गत या संस्थेत दाखल असलेल्या मुलीची वरील प्रमाणे दिलेली माहिती खरी असुन याबाबत कोणतीही माहिती खोटी आढळुन आल्यास "माझी कन्या भाग्यश्री" या योजनेअंर्तगत मिळालेले अनुदान वसुल करण्यास मी पात्र राहील.

(स्वाक्षरी)

दिनांक: संस्था अधिक्षक/व्यवस्थापक,

कार्यालयीन वापरासाठी

श्री/श्रीमती ------------------------------------------- यांनी सादर केलेल्या अर्जाची तपासणी करण्यात आली असून अर्ज शासन निर्णयानुसार परिपुर्ण आहे. (१) कु.------------------------------------ (२) कु.-------------------------------------------हिचा/हयांच्या नावे रुपये ---------------------- मुदत ठेव प्रमाणपत्र मिळण्यासाठी शिफारस करण्यात येत आहे.

स्वाक्षरी /नाव

दिनांक :- जिल्हा महिला बाल विकास अधिकारी

प्रति,
महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हा परिषद)

**प्रपत्र - 'क'**

**पालकांचे हमीपत्र**

**प्रति,**

बाल विकास प्रकल्प अधिकारी,

बाल विकास प्रकल्प कार्यालय, ---------

मी श्री / श्रीमती ------------------------------------------- राहणार, ---- ---------------------------------------------------------------ता.----------- --------------------------------जिल्हा ----------------------- असे हमीपत्र लिहून देतो की, मी माझी मुलगी कु. ------------------------------------ जन्म दिनांक हिला माझी कन्या भाग्यश्री सुधारित योजनेतंर्गत ------------------------------------- -- लाभासाठी आपल्याकडे, दिनांक / /२०१ रोजी अर्ज सादर केलेला आहे.

मी दिनांक रोजी कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केली आहे.

सदर योजनेंतर्गत मला मिळणारी लाभाची रक्कम ज्या कारणासाठी देण्यात आलेली आहे, ( मुलीचे शिक्षण/आरोग्य /आहार ) इ. त्याच कारणासाठी मी उपयोगात आणील. तसे न झाल्यास मला मिळालेली लाभाची रक्कम व्याजासह चलनाद्वारे शासनास परत करण्याची हमी देत आहे.

( आई/वडील दोघांची सही )

दिनांक पालकाची सही

समक्ष - उपरोक्त हमीपत्र माझ्या समक्ष लिहून दिलेले आहे.

सही /-

शिक्का अंगणवाडी सेविका

----------------------------